तालुका/प्रभाग स्तरावर आधार प्रकल्प राबविण्यात सहभागी असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना प्रोत्साहन देणे बाबत.

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांक - मातंसं २०१०/ प्र.क्र. ३/३९

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक - ११ एप्रिल, २०११.

वाचा - सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक - मातंसं २०१०/ प्र.क्र.४८/३९, दि .२८ जानेवारी २०११.

आधार प्रकल्पाच्या आंमलबजावणी करण्यासाठी केंद्र शासनाकडुन मार्च २०१२ पर्यंत देशभरात होणा-या पहिल्या २० कोटी यशस्वी नोंदणीसाठी प्रत्येक नोंदणीमागे रू. ५०/- इतका निधी देण्यात येत आहे. या ५० रुपयातील ५ रुपये जिल्हाधिकारी/ महानगरपालिका आयुक्तांना देण्याचे आणि त्यातील ४० टक्के म्हणजे २ रुपये तालुका /प्रभाग स्तरावर आधार प्रकल्प राबवण्यासाठी केलेल्या प्रशासकीय बाबीवर खर्च करण्याचे आदेश संदर्भाधिन दि.२८ जानेवारी २०११ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत. आधार प्रकल्पाची अंमलबजावणी राज्यात चांगल्या प्रकारे व्हावी म्हणून प्रकल्पाची अंमलबजावणी करणा-या अधिकारी व कर्मचा-यांना प्रोत्साहन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरून शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय:-

आधार क्रमांकाच्या प्रत्येक यशस्वी नोंदणी मागे जिल्हाधिकारी/ महानगरपालिका आयुक्तांना देण्यात येणा-या ५ रुपयातील २५ पैसे तालुका/प्रभाग स्तरावर आधार प्रकल्पाचे काम करणा-या अधिकारी व कर्मचा-यांना प्रोत्साहन किंवा बक्षीस म्हणून देण्यात येतील. सदर प्रोत्साहनपर रक्कम दर तिन महिन्यानी वर्षात चार वेळा देण्यात येईल. प्रोत्साहनपर रक्कम देण्यासाठी निकष ठरविण्याचे आणि त्यासाठी आवश्यक ती यंत्रणा गठीत करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी/महानगरपालिका आयुक्तांची राहील. उर्वरीत रु ४.७५ रकमेच्या ४० टक्के रक्कम जिल्हाधिकारी/ महानगरपालिका आयुक्तांना तालुका/प्रभाग स्तरावर आधार प्रकल्प राबवण्यासाठी केलेल्या प्रशासकीय बाबीवर खर्च करता येईल. त्यात खालील बाबीचा समावेश असेल.

(१) नोंदणी केंद्राच्या विजेसाठी केलेला खर्च.
(२) नोदणीच्या प्रक्रीयेवर दैनंदिन देखरेख करण्यासाठी केलेला खर्च.
(३) नोंदणी केंद्र व नोंदणी संस्था यांचा आढावा घेण्यासाठी केलेला खर्च.
(४) प्रकल्प राबविण्याच्या प्रयोजनासाठी केलेल्या प्रवासाकरिता द्यावयाचा प्रवास भत्ता, दैनिक भत्ता ई.
(५) प्रकल्पासाठी आयोजीत केलेले प्रशिक्षण, कार्यशाळा आणि त्यावेळी दिलेले भोजन,चहापान ई. वर केलेला खर्च.
(६) प्रकल्पाला चालना देण्यासाठी केलेल्या जाहिरातीवर व तत्सम बाबीवर केलेला खर्च.
(७) आधार प्रकल्पाच्या प्रयोजनासाठी केलेला संकीर्ण खर्च.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. त्याचा संगणक संकेतांक२०११०४११३०५५९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सू . ह. जाधव )
शासनाचे उप सचिव.

प्रति,

सर्व विधान सभा/विधान परिषद सदस्य
मा. राज्यपाल याचे सचिव
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
उप महासंचालक, विशिष्ट ओळख प्राधिकरण, क्षेत्रीय कार्यालय, मुंबई
महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयत) -१/२ महाराष्ट्र , मुंबई/नागपूर
महालेखाकार (लेखापरीक्षा) - १/२ महाराष्ट्र , मुंबई/नागपूर
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महानगर पालीकांचे आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व कोषागारे
निवड नस्ती